**जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात आलेल्या मागासवर्गीय मुलामुलांची शासकीय वसतीगृहे व सफाई कामगारांच्या मुलांच्या निवासी शाळा परत राज्य शासनाकडे वर्ग करण्याबाबत**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक -शावगृ-२००३/प्र.क्र.६६४/मावक-४,
मंत्रालय, विस्तार भवन, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ८ सप्टेंबर , २००४.

**वाचा :** १)शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक -बीजीटी:-२०००/प्र.क्र.१५५/अर्थसंकल्प, दिनांक ४ नोव्हेंबर २०००
२)शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक -सकआ:-२०००/प्र.क्र.२७१/आस्था-२, दिनांक ४ नोव्हेंबर २०००
३)शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक -बीजीटी:-२०००/प्र.क्र.२१७२/आस्था-२, दिनांक ६ नोव्हेंबर २०००
४)शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक -बीजीटी:-२०००/प्र.क्र.१५५/अर्थसंकल्प, दिनांक २४ जानेवारी २००१
५)शासन निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग
क्रमांक -बीजीटी:-२०००/प्र.क्र.१५५/अर्थसंकल्प, दिनांक ३ फेब्रुवारी २००१
६)शासन निर्णय, सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व विशेष सहाय्य विभाग
क्रमांक -शावगृ:-२००३/प्र.क्र.६६४/मावक-४, दिनांक २८ मे २००४

**प्रस्तावना** -शासन निर्णय , समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य व क्रीडा विभाग क्रमांक -बीजीटी:-२०००/ प्र.क्र. १५५/ अर्थसंकल्प, दिनांक ४ नोव्हेंबर २०००, २४ जानेवारी २००१ व ३ फेब्रुवारी २००१ अन्वये समाजकल्याण विभागाच्या ४० योजना जिल्हा परिषदांकडे हस्तांतरीत करण्यात आल्या आहेत. यामध्ये जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या कलम १०० व कलम १२३ अन्वये मागासवर्गीय मुलामुलींची शासकीय वसतीगृहे हस्तांतरीत करण्यात आली आहेत. तसेच कलम १०० खाली "सफाई कामगारांच्या विशेषतः मेहतरांच्या मुलांकरीता शाळा" ही योजना सुध्दा हस्तांतरीत करण्यात आली आहे. महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या कलम १०० खाली हस्तांतरीत करण्यात आलेली " आर्थिकदृष्ट्या मागासलेल्या मुलामुलींसाठी वसतीगृह सुरु करणे व त्यांची देखभाल करणे" ही योजना शासन निर्णय दिनांक २८ मे २००४ अन्वये सामाजिक न्याय विभागाकडे परत घेण्यात आली आहे. कलम १२३ अन्वये जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात आलेली "अनुसूचित जातींच्या मुलामुलींकरीता असलेल्या शासकीय वसतीगृहांना परिरक्षण अनुदान ( जिल्हा मुख्यालय व महानगरपालिका स्तर वगळून)" ही योजना व कलम १०० अन्वये जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात आलेली "सफाई कामगारांच्या विशेषतः मेहतरांच्या मुलांची शाळा" ही योजना सामाजिक न्याय विभागाकडे परत वर्ग करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-** याबाबत विचार करुन शासन अधिसूचना क्रमांक बीजीटी-२००४/प्र.क्र.१५५/अर्थसंकल्प, दिनांक ४ नोव्हेंबर २००० अन्वये महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या कलम १२३ खाली जिल्हास्तर वगळता जिल्हा परिषदांकडे हस्तांतर करण्यात आलेल्या "अनुसूचित जातीच्या मुलामुलींकरीता असलेल्या शासकीय वसतीगृहांना परिरक्षण अनुदान (जिल्हा मुख्यालय व महानगरपालिका स्तर वगळून)" ही योजना व महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या कलम १०० अन्वये जिल्हा

परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात आलेली "सफाई कामगारांच्या विशेषतः मेहतरांच्या मुलांकरीता शाळा " ही योजना राज्य शासनाच्या सामाजिक न्याय विभागात परत हस्तांतरीत करण्यात येत आहे .

२. वरील हस्तांतरीत होणाऱ्या शासकीय वसतीगृह व सफाई कामगारांच्या मुलांच्या शाळा या विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांच्या नियंत्रणाखाली ठेवण्यात याव्यात. वरीलप्रमाणे शासकीय वसतीगृहे व सफाई कामगारांच्या मुलांच्या शाळा हस्तांतरीत करताना त्यांच्या जिल्हा परिषदेकडे वर्ग करण्यात आलेली पदे व त्यानुसार प्रतिनियुक्ती भत्ता न देता वर्ग करण्यात आलेले सर्व कर्मचारीवर्गासह परत राज्यस्तरावर वर्ग करण्यात यावीत.

३. या संदर्भातील आर्थिक तरतूदीबाबत संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी आवश्यक ती पुढील कार्यवाही करावी.

४. हा शासन निर्णय ग्रामविकास व जलसंधारण विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक -७५४/०४/व्यय १४, दिनांक २८.७.२००४ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(नं. भा. शिलवंत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,
मा.राज्यपाल यांचे सचिव,राजभवन, मुंबई
मा.मुख्यमंत्री यांचे सचिव.
मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव.
सर्व मा.मंत्री, मा.राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव
सर्व मंत्रालयीन विभाग
सचिव,ग्राम विकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई
संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परीक्षा)/(लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर
मुख्य लेखा परिक्षक स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई, वाशी
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
सर्व विभागीय आयुक्त/सर्व जिल्हाधिकारी.
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
सर्व विभागीय समाज कल्याण अधिकारी.
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी
सर्व समाज कल्याण अधिकारी, गट - अ, जिल्हा परिषद
कक्ष अधिकारी- आस्था-२/मावक-२/अर्थसंकल्प, सा.न्या.सां.का.,क्री.व वि.स.विभाग, मंत्रालय,मुंबई ३२
निवड नस्ती , मावक - ४

१९०४

# महाराष्ट्र शासन

## अधिसूचना

सामाजिक न्याय, सांस्कृतिक कार्य,क्रीडा व
विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ८ सप्टेंबर ,२००४.

**महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१**

क्रमांक शावगृ-२००३/प्र.क्र.६६४/मावक-४, महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ (सन १९६२ चा महाराष्ट्र- पाच) च्या कलम १०० चे पोटकलम ( १ ) चा खंड (ब) आणि कलम ६ चे पोटकलम (२) व महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम १९६१(सन १९६२ चा महाराष्ट्र -पाच) च्या कलम १२३ च्या पोटकलम (१) अन्वये प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांचा व याबाबत शासनास प्रदान करण्यात आलेल्या सर्व अधिकारांचा वापर करुन शासन अधिसूचना क्रमांक बीजीटी-२०००/प्र.क्र.१५५/ अर्थसंकल्प, दिनांक ४.११.२०००, २४.१.२००१ व ३.२.२००१ अन्वये सामाजिक न्याय विभागाच्या ४० योजना जिल्हा परिषदेकडे हस्तांतरीत करण्यात आल्या आहेत. या योजनांपैकी महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या कलम १२३ अन्वये जिल्हा परिषदेकडे शासन अधिसूचना दिनांक ४.११.२००० अन्वये हस्तांतरीत केलेल्या योजनामधील अनुक्रमांक ३ वर नमूद केलेली "अनुसूचित जातीच्या मुलामुलींकरीता असलेली शासकीय वसतीगृहांना परिरक्षण अनुदान (जिल्हा मुख्यालय व महानगरपालिका स्तर वगळून) " ही योजना ही अधिसूचना शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासून सामाजिक न्याय विभागाकडे परत हस्तांतरीत करण्यात येत आहे.

२. तसेच महाराष्ट्र जिल्हा परिषदा व पंचायत समित्या अधिनियम, १९६१ च्या कलम १०० अन्वये जिल्हा परिषदेकडे शासन अधिसूचना दिनांक ४.११.२००० अन्वये हस्तांतरीत करण्यात आलेल्या योजनामधील अनुक्रमांक १ वर नमूद केलेल्या "सफाई कामगाराच्या विशेषतः मेहतराच्या मुलाकरीता शाळा" ही योजना ही अधिसूचना शासन राजपत्रात प्रसिध्द झाल्याच्या दिनांकापासुन सामाजिक न्याय विभागाकडे परत हस्तांतरीत करण्यात येत आहे.

३. वरील योजनाबाबत महाराष्ट्र शासन असे निर्देशित करते की,

(अ) वरील हस्तांतरीत होणारी शासकीय वसतीगृहे व सफाई कामगारांच्या मुलांच्या शाळा या विशेष जिल्हा समाजकल्याण अधिकारी यांच्या नियंत्रणाखाली ठेवण्यात यावीत.

(ब) वरीलप्रमाणे शासकीय वसतीगृह व सफाई कामगारांच्या मुलांच्या शाळा हस्तांतरीत करताना जिल्हा परिषदेकडे वर्ग करण्यात आलेली पदे व त्यानुसार प्रतिनियुक्ती भत्ता न देता वर्ग करण्यात आलेल्या सर्व कर्मचारीवर्गासह परत राज्यस्तरावर वर्ग करण्यात यावीत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( नं. मा.शिलवंत)
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

GOVERNMENT OF MAHARASHTRA

NOTIFICATION

Social Justice, Cultural Affairs, Sports and Special Assistance Department,
Mantralaya, Mumbai-400032.
Date:- 8 th September, 2004

Maharshtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961

No.SVG-2003/CR-664/BCW-IV.- In exercise of the powers conferred by Clause (b) of Sub-Section (1) of Section 100 and Sub-Section (2) of Section 6 of the Maharshtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 (Mah.V of 1962) and Sub-Section (1) of Section 123 of the Maharshtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act 1961 (Mah.V of 1962) and of all other powers enabling it in that behalf the Government of Maharashtra has transferred 40 schemes which were implemented by the Social Welfare Department to the respective Zilla Parishads vide Government Notification No.BGT-2000 / CR-155/Budget, dated 4th November 2000, 24th January 2001 and 3rd February 2001. Out of these 40 schemes the scheme mentioned in Column 3 of Government Notification dated 4th November, 2000 "Maintenance of Government Hostels for Scheduled Castes Boys and Girls (other than District Head quarter and Corporation) " shall now be transferred back to the Social Justice Department with effect from the date of publication of this notification in the Official Gazette.

2. Also out of 40 schemes the scheme transferred to Zilla Parishads under Section 100 of the Maharshtra Zilla Parishads and Panchayat Samitis Act, 1961 vide Government Notification dated 4th November 2000, the scheme mentioned at Column No.9 "School for children of parents engaged in unclean occupation" shall now be transferred back to the Social Justice Department with effect from the date of publication of this notification in the Official Gazette.

3. For above mentioned transferred scheme, the Government of Maharashtra further directs that:-

(A) These transferred Government hostels and school for children of parents engaged in unclean occupation shall be kept under overall control of the Special District Social Welfare Officer of the respective District.

(B) For implementation of this scheme the posts which were transferred to the Zilla Parishads and all State Government employees deputed without deputation allowance to the Zilla Parishads shall now be transferred to the State level.

By order and in the name of the Governor of Maharashtra.

( N. M. Shilwant )
**Under Secretary to Government**